वितरण आदेश क्र. ९

नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेच्या इमारतीचे विस्तारीकरण करण्याच्या बांधकामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.
(सन २०१६-१७) योजनांतर्गत (४०७० ०२३१)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टीआरएन -२०१६/८००/प्र.क्र.२००/१६/१२-अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ** :- १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८०/अर्थसंकल्प,३ दि.१ एप्रिल, २०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.६ एप्रिल, २०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र .- बीयुडी२०१६-/ प्र.क्र ५२./२०१६/२५, दि .२२ एप्रिल, २०१६
५. संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांचे क्र. नामप्रप्र/कक्ष-१ /४/ कावि/४७० / २०१६ दि.३०.०९.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना** :-

राज्य प्रशिक्षण धोरण २०११ नुसार घोषित झालेल्या ६ विभागीय संस्था व ३६ जिल्हा संस्थांमध्ये प्रशिक्षणाकरिता येणा-या प्रशिक्षणार्थी यांच्यासाठी आवश्यक त्या पायाभूत सोई- सुविधा निर्माण करणे गरजेचे आहे. त्याकरिता मागणी क्र.ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे, या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये एकूण रु.२०.००कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२५ च्या संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार एकूणरु.३३३.३३ लाख एवढे सहायक अनुदान, लेखा अनुदान म्हणून दोन महिन्यांच्या खर्चासाठी देण्यात आले होते.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्तीय वर्ष २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १००% च्या मर्यादेत प्रथम नऊ महिन्याकरिता ( डिसेंबर २०१६ अखेर ) रु.२०००.०० लाख इतका निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. आता, संबंधित लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार ७० % च्या मर्यादेत रु. १४.०० कोटी ( रुपये चौदा कोटी ) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर मंजूरीकरिता उपलब्ध करून देण्यात आला आहे.

३. नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेच्या प्रशिक्षण इमारतीमध्ये प्रशिक्षणार्थी यांच्या निवास व्यवस्थेमध्ये वाढ होण्याकरिता तिस-या मजल्याचे विस्तारित बाधकाम प्रस्तावित आहे. या बांधकामाकरिता रु.३.२५ कोटी इतक्या रक्कमेचे सहायक अभियंता, दक्षिण सा.बां. उपविभाग नाशिक व कार्यकारी अभियंता, सा.बा.वि. नाशिक यांनी प्राथमिक स्वरुपाचे अंदाजपत्रक तयार केले

असून, संस्थेने संदर्भाधीन क्र.५ च्या पत्रान्वये रु.३.२५ कोटी एवढया रकमेचे अंदाजपत्रक व आराखडा सादर करुन निधीची मागणी केली आहे. त्या अनुषंगाने संस्थेच्या सदर कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन निधी वितरित करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेच्या प्रशिक्षण इमारतीमध्ये तिस-या मजल्याच्या विस्तारित बाधकामाकरिता रु. ३.२५ कोटी एवढया रकमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेसाठीचा प्रस्ताव सा.बां.विभागाकडे सादर करण्यात आला होता.

२. प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, छाननीअंती प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकाची एकूण **रु.३४२.९६ लाख ( अक्षरी रुपये तीन कोटी, बेचाळीस लाख, शहाण्णव हजार फक्त**) इतकी रक्कम खालील तक्त्यात दिल्याप्रमाणे बाबनिहाय निश्चित केली आहे.

Recapitulation Sheet

| Sr.No. | Essential Sheet | Cost in Rs. |
|---|---|---|
| | Area of Building ( Quarters) sqm<br>Rate of Consumption Rs./Sqm( As per Block Rates ) | 998.85<br>26427.66 |
| 1. | Cost of Work Portion | 2,66,26,645.00 |
| 2. | Internal Electrical Installation (5%) | 13,31,332.00 |
| 3. | External Water supply and Sanitation (4%) | 10,65,066.00 |
| 4. | Furniture | 9,76,000.00 |
| | **Total (A) Rs.** | **2,99,99,043.00** |
| 5 | Contengencies (4%) | 11,99,962.00 |
| 6 | Computerisation (2%) | Nil |
| | **Total (B) Rs.** | 11,99,962.00 |
| | **Total (A)+(B) Rs.** | **3,11,99,005.00** |
| | Centage charges 5% on Total ( A ) | **1499952.00** |
| | 15% Service Tax on 40% cost of Original Bldg. cost | **1597599.00** |
| | **Say Rs.in Lacs** | **3,42,96,556.00** |

३. सदरहू किंमत निश्चित करताना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून खालील बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

१. सदर इमारत तळ मजल्यावर ३ मजले अशी प्रस्तावित असून इमारतीचे एकूण प्रस्तावित बांधकाम क्षेत्रफळ ९९८.८५ चौ.मी. आहे.

२. सदर कामाचे नकाशे शासकीय मुख्य वास्तूशास्त्रज्ञ यांनी तयार केलेले आहेत. Job No.NSK-२००१/I-०१.

३. सदर कामाचा सरासरी दर रु.२६,४२७.६६ प्रति चौ.मी. असा आहे.

४. अंदाजपत्रक सहाय्यक अभियंता, ( श्रेणी -१ ) सा.बां. दक्षिण विभाग,नाशिक यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग नाशिक, यांनी साक्षांकित केले असून उपभोक्ता विभागाने साक्षांकित केलेले नाही.

५. अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीवर अधारित आहे. अंदाजपत्रकात फर्निचरसाठीची तरतूद ढोबळ स्वरुपात करण्यात आली आहे. सदरील कामास उपभोक्ता खात्याची सहमती गृहित धरण्यात येत आहे. तसेच सदरील अतिरिक्त बाबीच्या किंमती या ढोबळ

स्वरुपात असून त्याबाबतची प्राथमिकता उपभोक्ता खात्याने त्यांच्या स्तरावर ठरवावी. कामाची निकड लक्षात घेता सदरील बाबी ढोबळ स्वरुपात केल्याप्रमाणे ठेवण्यात येत आहेत.

६. अंदाजपत्रकात ४ टक्के पाणी पुरवठा व मल:निस्सारण, ५ टक्के अंतर्गत विद्युतीकरण, ४ टक्के आकस्मिक खर्च, २५ टक्के सेवा कर व ५ टक्के सेंटेंज चार्जेसची व संभाव्य दरसूची याप्रमाणे तरतूदी योग्य करण्यात आल्या आहेत. तसेच, संगणकीकरण वगळण्यात येत आहे.

४. सार्वजनिक बांधकाम विभागाने, वरीलप्रमाणे आवश्यक सुधारणा व दुरुस्त्या करुन खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तुत कामासाठी एकूण **रु.३४२.९६ ( रुपये तीन कोटी, बेचाळीस लाख, शहाण्णव हजार, फक्त** ) इतक्या **रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.**

(अ) सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना उपभोक्त्या विभागामार्फत सा.बां.विभाग शासन निर्णय क्र. बीडीजी २०१४/प्रक्र.९६/इमा.३ दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात आली आहे, असे सा.बां. विभागामार्फत गृहीत धरण्यात येत आहे.

(ब) प्रस्तूत अंदाजपत्रक व नकाशे यावर सा.बां. विभागाच्या सक्षम अधिका-यांचे साक्षांकन करुन घेणे बंधनकारक आहे.

(क) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(ड) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.ईएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तांत्रिक कक्ष १, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करावी.

५. त्यानुसार, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेंच्या इमारतीच्या विस्तारित बांधकामाच्या विविध कामानुसार परिच्छेद क्र.२ मधील तक्त्यातील रकाना क्र.३ नुसार निश्चित केलेल्या एकूण **रु.३४२.९६** (रुपये तीन कोटी, बेचाळीस लाख, शहाण्णव हजार फक्त ) इतक्या रकमेच्या प्रस्तावास, सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केलेल्या वरील परिच्छेद क्र.४ मधील, (अ) (ब) (क) (ड) व (इ) च्या अटींच्या अधिन राहून, तसेच वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्र. ४, परिच्छेद क्र. २७ (२) प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यास हरकत नसावी.

६. नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक जिल्हा-औरंगाबाद या संस्थेंच्या वरील कामांसाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला **एकूण रु.३४२.९६** ( रुपये तीन कोटी, बेचाळीस लाख, शहाण्णव हजार, फक्त **एवढा निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.**

७. यासाठी **रु.३४२.९६** ( रुपये तीन कोटी, बेचाळीस लाख, शहाण्णव हजार, फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

८. त्याचप्रमाणे, सदर निधी सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांना सदर कामाच्या अनुषंगाने त्यांच्या मागणीनुसार वितरित करण्यात यावा. तसेच, सदर इमारतीवरील वाढविण्यात येणारे एका मजल्याचे बांधकाम सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात पूर्ण करणे बंधनकारक राहील.

९. सदरहू मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

१०. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र २, नागपूर यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

११. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र-१, मुंबई,यांना राहतील आणि त्याकरीता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१२. प्रस्तुत शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग, यांच्या मान्यतेने अनौ.संदर्भ क्र. १०/१७ इमारती-३, दि.५.१.२०१६, अन्वये तसेच, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ ३, दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच त्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२१६१७१८५०१००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijaykumar
Parshuram
Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=General Administration Department,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a8
72b3754b63c343b66d6b91dd6b276,
cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.02.16 17:25:20 +05'30'

( वि.प. सोष्टे )
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. विभागीय आयुक्त, नाशिक.
३. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
४. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
५. संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
६. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२,
७. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती.१२-अ.